**जिल्हा भ्रष्टाचार निर्मुलन समितीची पुनर्रचना**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक, क्र.भ्रष्टानि-२००१/प्र.क्र.७/११-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १६ जून, २००१.

संदर्भ : १) शासन परिपत्रक क्र.सीडीआर-१०९६/प्र.क्र.२०/९६/११, दि.१३ डिसेंबर,१९९६.
२) शासन परिपत्रक क्र.भ्रनिस-१०९७/५०/प्र.क्र.२४/९७/१८-अ, दि.११ मार्च,१९९७.

**परिपत्रक**

विभागीय / जिल्हा / तालुका स्तरावर भ्रष्टाचार निर्मूलन समित्या स्थापन करण्याचा निर्णय संदर्भाधीन क्र.१ येथील शासन परिपत्रकान्वारे घेण्यात आला. या समित्यांपैकी जिल्हा स्तरावरील भ्रष्टाचार निर्मूलन समितीची पुर्नरचना करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुसार यापुढे, जिल्हा भ्रष्टाचार निर्मूलन समित्यांमधील अशासकीय सदस्यांची नेमणूक समाजाच्या खालील गटांमधील व्यक्तींमधून शासनाकडून दर दोन वर्षांनी केली जाईल.

१) शासकीय व संरक्षण दलातील व्यक्ती,
२) स्वातंत्र्य सैनिक,
३) स्वयंसेवी संस्थांचे प्रतिनिधी,
४) लोकांचा विश्वास संपादन केलेल्या व्यक्ती,
५) लोकप्रतिनिधी,
६) श्री.अण्णा हजारे सुचवितील अशी व्यक्ती,
७) प्राचार्य,
८) समाजसेवक,

जिल्हा भ्रष्टाचार निर्मूलन समितीवर अशासकीय सदस्यांची नेमणूक करताना प्रत्येकी एक सदस्य १) महिला २)अनुसूचित जाती / जमाती ३) विमुक्त व भटक्या जाती/जमाती ४) इतर मागासवर्गीय या प्रवर्गांमधून निवडणे आवश्यक राहील. मात्र, कोणत्याही परिस्थितीत अशासकीय सदस्यांची एकूण संख्या १० पेक्षा अधिक रहाणार नाही.

जिल्हा भ्रष्टाचार निर्मूलन समितीवर अशासकीय सदस्यांची नेमणूक करताना शासन परिपत्रक क्र.भ्रनिस-१०९७/५०/प्र.क्र.११/९८/१८-अ, दि.१/८/९८ नुसार विहित केलेली कार्यपध्दती अनुसरण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( भि.रा.वाढवे )
उप सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति,
मा.राज्यपालांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

(कृ.मा.प...

एच-285(4000-6-01)

मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
मुख्य सचिव,
सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
सर्व मंत्र्यांचे खाजगी सचिव / सर्व राज्यमंत्र्यांचे स्वीय सहायक,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय,मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग (या परिपत्रकातील सूचना त्यांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग / कार्यालय प्रमुख यांच्या निदर्शनास आणण्याच्या सूचनेसह)
सर्व विभागीय आयुक्त,
पोलिस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
सर्व पोलिस उप महानिरीक्षक / पोलिस आयुक्त / पोलीस अधीक्षक,
सर्व पोलिस अधीक्षक/ पोलिस उपअधीक्षक, लाचलुचपत प्रतिबंध विभाग,
सर्व मुख्य अभियंता / सार्वजनिक बांधकाम विभाग व पाटबंधारे विभाग,
सर्व जिल्हाधिकारी / उपायुक्त (महसूल),
सर्व अधीक्षक / कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग व पाटबंधारे विभाग,
सर्व विभागीय कृषि सह संचालक / अधीक्षक कृषी अधिकारी/ तालुका कृषी अधिकारी,
सर्व वनसंरक्षक,
सर्व सहनिबंधक, सहकारी संस्था,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था,
सर्व निवासी उप जिल्हाधिकारी,
सर्व तहसिलांचे प्रभारी सहायक किंवा उप जिल्हाधिकारी,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.
*पत्राने

---